महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतन बाबीकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०२० ते जुन, २०२० या तीन महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत ...

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :-राअआ-२०२०/प्र.क्र.२४/का-९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०५ मे, २०२०.

**वाचा :-**

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दि.१६ एप्रिल,२०२०.

(२) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/संकीर्ण/प्र.क्र.३५/२०२०/का-३ दि. २७/०४/२०१९ चे पत्र व सहपत्रे.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयास सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०२० ते जुन, २०२० या तीन महिन्यांचा वेतनावरील खर्च भागविण्याकरीता मंजूर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६ सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.९०,३०,०००/- (अक्षरी रूपये नव्वद लक्ष तीस हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.-

२. उपरोक्त संदर्भ क्र. (१) येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये सन २०२०-२१ च्या प्रथम तीन महिन्यांकरीता एप्रिल, २०२० ते जुन २०२० कालावधीकरीता रु.२२,५७,५००/- (अक्षरी रुपये बावीस लक्ष सत्तावन हजार पाचशे फक्त) एवढा निधी उपलब्ध असून, सदर (बीम्स) प्रणालीद्वारे मंत्रालयीन विभागांना अनुदान वितरित करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी प्रथम तीन महिन्यांकरीता (एप्रिल २०२० ते जुन, २०२०) मासिक अनुदान प्रति माह रु.७,५२,५००/- (अक्षरी रुपये सात लक्ष बावन्न हजार पाचशे फक्त) (७,५२,५००X३=२२,५७,५००) प्रमाणे रू. २२,५७,५००/- (अक्षरी रूपये बावीस लक्ष सत्तावन हजार पाचशे फक्त) एवढे वेतन अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

३. सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये सदर वितरीत निधीपैकी खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच प्रत्यार्पित केलेल्या अनुदानाच्या चलनाची पावती आयोगाने शासनास सादर सादर केली आहेत. वित्त विभागाचे शासन परिपत्रक दिनांक १६.०४.२०२० अन्वये, एप्रिल २०२० ते जुन, २०२० या तीन महिन्याच्या कालावधीकरिता एकूण रू. २२,५७,५००/- एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे.. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या वेतनाच्या बाबीकरीता त्यांनी मागणी केल्याप्रमाणे माहे एप्रिल, २०२० ते माहे जुन, २०२० या तीन महिन्याकरीता **(रु.७,५२,५०० X ३ = रु.२२,५७,५००) एकूण रू. २२,५७,५००/- (अक्षरी रूपये बावीस लक्ष सत्तावन हजार पाचशे फक्त)** इतके अनुदान, ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली खालील दर्शविल्याप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **तपशीलवार लेखाशीर्ष** | **सन २०२०-२१ साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान (रु.)** | **तीनमाही साठी वितरित अनुदान ( माहे एप्रिल, २०२० ते जुन, २०२०) (मूळ तरतुदीप्रमाणे) (रु.)** | **माहे एप्रिल २०२० ते जुन २०२० करिता मंजूर अनुदान (प्रतिमाह ) (रु.)** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **६** |
| १ | ३६,सहायक अनुदाने (वेतन) | ९०,३०,०००/- | २२,५७,५००/- | ७,५२,५०० X ३ = रु. २२,५७,५००/- |
| | **एकूण** | **९०,३०,०००/-** | **२२,५७,५००/-** | **रु. २२,५७,५००/-** |
| | | | | **( अक्षरी रुपये बावीस लक्ष सत्तावन हजार पाचशे फक्त )** |

४. सदर तरतुद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता, ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२०-२१ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाच्या खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी.

या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certification शासनांस सादर करणे तसेच संदर्भ क्र.(१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी “मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

६. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२० मधील अटींची तसेच सोबतच्या परिशिष्टामधील सर्व बाबींची पुर्तता होत असून, प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.”

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५०५१२५३०८४११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh M.
Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.05.05 12:59:57 +05'30'

**( दि. मा. सोनावणे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).